पवित्र (PAVITRA-Portal For Visible To All Teachers Recruitment) या संगणकीय प्रणालीव्दारे राज्यातील सर्व व्यवस्थापनाच्या शाळांमधील शिक्षक निवडीसाठी पारदर्शक पध्दती विहीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,**
**शासन निर्णय क्र. सीईटी २०१५/प्र.क्र.१४९/टीएनटी-१,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक :०७ फेब्रुवारी, २०१९**

वाचा :-

१) न निर्णय, शा.शि.व क्री.वि. क्र.पीआरई २००८/(४७६७)/प्राशि-१, दि.३०.०४.२००८ आणि दि.१६.१२.२००९.
२) शासन निर्णय, शा.शि.व क्री.वि. क्र.न्यायाप्र २०११/(३९७/११)/माशि-२, दि.९.११.२०११.
३) शासन निर्णय, शा.शि.व क्री.वि. क्र.एसएसएन १००७/(३६/०७)/माशि-२, दि.६.०२.२०१२.
४) शासन निर्णय, शा.शि.व क्री.वि. क्र.सीईटी २०१५/प्र.क्र.१४९/टीएनटी-१, दि.१२.०६.२०१७, दि.२३.०६.२०१७ आणि दि.२०.०६.२०१८.
५) शासन निर्णय, शा.शि.व क्री.वि. क्र.एसएसएन २०१७/(२०/१७)/टीएनटी-२, दि.२३.०८.२०१७.
६) शासन निर्णय, शा.शि.व क्री.वि. क्र.एसएसएन २०१७/(९३/१७)/टीएनटी-२, दि.१३.०३.२०१८.
७) शासन निर्णय, शा.शि.व क्री.वि. क्र.एसएसएन २०१४/(०१/१४)/टीएनटी-२, दि.०७.११.२०१७.

प्रस्तावना :-

स्थानिक स्वराज्य संस्थांच्या प्राथमिक शाळेतील शिक्षकांची यापूर्वी निवड केंद्रीय भरतीपूर्व निवड परीक्षेव्दारे (C.E.T.) करण्यात येत होती. तर महाराष्ट्र खाजगी शाळातील कर्मचारी (सेवेच्या शर्ती) अधिनियम, १९७७ मधील तरतूदीनुसार खाजगी शाळातील शिक्षकांची नियुक्ती विहीत प्रक्रियेव्दारे संबंधित खाजगी व्यवस्थापनामार्फत करण्यात येत होती. तथापि, शिक्षक निवड आणि नियुक्ती प्रक्रियेत अनियमितता होत असल्याच्या तक्रारी शासनास प्राप्त झाल्या तसेच गुणवत्ताधारक उमेदवारांची निवड न झाल्यामुळे विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक गुणवत्तेवर परिणाम होण्याची शक्यता असल्याची बाब निदर्शनास आली .

२. मा.उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ नागपूर येथील जनहित याचिका क्र.८/२०१५ च्या अनुषंगाने दि.२४.०६.२०१५ रोजी न्यायालयाने खाजगी अनुदानित शाळेतील शिक्षक भरती मधील गैरव्यवहार टाळण्यासाठी व शिक्षकांची निवड गुणवत्तेवर आधारीत होऊन निवड प्रक्रिया पारदर्शक होण्यासाठी राज्य शासनाने उपाययोजना करावी असे निर्देश दिले होते. T.M.A.Pai Foundation and Others विरुद्ध State Govt. या प्रकरणात सर्वोच्च न्यायालयाने न्यायालयीन निर्णय देताना खाजगी शाळांमधील निवड प्रक्रियेमध्ये राज्य शासनास हस्तक्षेप करता येणार नाही, असे निर्देश दिलेले होते. याबाबत दोन्ही न्यायालयांचे आदेश विचारात घेऊन पुढील कार्यवाही करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

स्थानिक स्वराज्य संस्था तसेच खाजगी शाळेतील प्रचलीत शिक्षण सेवक भरती प्रक्रिया रद्द करुन या सर्व बाबींचा विचार करुन राज्यातील सर्व स्थानिक स्वराज्य संस्थांसह खाजगी व्यवस्थापनाच्या प्राथमिक, उच्च प्राथमिक, माध्यमिक तसेच उच्च माध्यमिक शाळांमधील रिक्त पदे उपरोक्त प्रमाणे अभियोग्यता व बुध्दीमत्ता चाचणी परीक्षेतील गुणांच्या आधारे भरण्याचा निर्णय घेण्यात आला. त्यानुसार शासन अधिसूचना दि.२२.०६.२०१७ अन्वये महाराष्ट्र खाजगी शाळातील कर्मचारी (सेवेच्या शर्ती) नियमावली, १९८१ मध्ये सुधारणा करण्यात आली. त्याअनुषंगाने विस्तृत परीक्षा पध्दत शासन निर्णय दि.२३.०६.२०१७ अन्वये आणि शिक्षण सेवक निवड प्रक्रियेबाबतची कार्यपध्दती दि.२०.०६.२०१८ च्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आली. सदर अभियोग्यता चाचणी परीक्षेची वैशिष्ट्ये खालीलप्रमाणे आहेत :-

१) अभियोग्यता चाचणी व शिक्षण सेवक निवड प्रक्रिया संगणकीय प्रणालीव्दारे करण्यात येणार आहे.

२) या कार्यपध्दतीत संबंधित स्थानिक स्वराज्य संस्था व खाजगी शैक्षणिक संस्था (यापुढे "शैक्षणिक संस्था" असे वाचावे.) यांना त्यांच्या शाळांमधील शिक्षकांची रिक्त पदे भरताना आरक्षण विषयक बाबी विचारात घेऊन पदांची जाहिरात शासनाच्या संकेतस्थळावर संगणकीय प्रणालीवर किमान कालावधीकरीता प्रसिध्द करावी लागेल.

३) अभियोग्यता चाचणीच्या माध्यमातून उमेदवारास त्याच्या गुणांमध्ये वाढ करण्याची संधी त्याच्या सेवाप्रवेश वयोमर्यादेत ५ वेळा उपलब्ध होईल.

४) अभियोग्यता चाचणी परीक्षा दिलेल्या उमेदवारांची यादी प्रसिध्द करण्यात येणार नाही. सदर चाचणी परीक्षा दिलेल्या उमेदवारास, शैक्षणिक संस्थेने प्रसिध्द केलेल्या जाहिरातीस अनुसरुन अर्ज करता येईल.

५) संस्थेच्या जाहिरातीस प्रतिसाद दिलेल्या उमेदवारांची, अभियोग्यता चाचणीतील गुणांच्या आधारे ज्या विषयासाठी शिक्षण सेवक म्हणून अर्हताप्राप्त उमेदवारांची नियुक्ती करावयाची आहे त्या विषयनिहाय गुणवत्ता यादीतील अग्रक्रमानुसार शिक्षण सेवक म्हणून निवड सदर संस्थेस करावी लागेल.

६) शिक्षकांची भरती गुणवत्तेच्या आधारे पारदर्शक पध्दतीने व विहीत कालमर्यादेत होईल.

(७) शिक्षकांच्या भरती प्रक्रीयेमध्ये राज्य शासनाचा अथवा खाजगी व्यक्तींचा हस्तक्षेपास वाव राहणार नाही.

३. दरम्यानच्या काळात सदर निवड प्रक्रियेबाबत काही खाजगी शैक्षणिक संस्थांनी उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ नागपूर येथे रिट याचिका दाखल केली. रिट याचिका क्र.५०५९/२०१७ व इतर अनुषंगिक याचिकेच्या अनुषंगाने मा.न्यायालयाने दि.२१.११.२०१८ रोजी खालीलप्रमाणे आदेश पारीत केले आहेत :-

1. The validity of Rules 6(2) and (3) and 9(2A) and (2B) of the MEPS Rules, introduced on 22.06.2017, is upheld on the touchstone of competency of the State Government and Article 19(1) (g) of the Constitution of India.

2. The procedure for selection and appointment of the teachers in the private schools, receiving or eligible to receive full or partial grant-in-aid from the State exchequer, shall be governed by the provisions of Rule 6(1),(2) & (3) read with Rule 9(2A) and (2B) of the MEPS Rules, as are interpreted by us in paras 34, 36, 39 and 44 of this judgment without interfering with the right of the Management and / of the School Committee to select and appoint the qualified, eligible and suitable candidate by holding the personal interview.

खाजगी शैक्षणिक संस्थांना शिक्षक भरती करतेवेळी उमेदवारांची मुलाखत घेण्याचे स्वातंत्र्य न्याय निर्णयानुसार प्रदान करण्यात आले आहे. त्यामुळे स्थानिक स्वराज्य संस्था व खाजगी शैक्षणिक संस्थांमधील शिक्षक भरती करीता सुधारीत कार्यपध्दती निश्चित करणे आवश्यक होते. ही बाब विचारात घेऊन उच्च न्यायालय मुंबई, नागपूर खंडपीठ यांनी याचिका क्र.५०५९/१८ व इतर याचिकेच्या अनुषंगाने दि. २१.०१.२०१८रोजी दिलेल्या आदेशानुसार दि.२३.०६.२०१७ व दि.२०.०६.२०१८ चे शासन निर्णय सुधारीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील सर्व स्थानिक स्वराज्य संस्थांच्या /खाजगी व्यवस्थापनाच्या अनुदानित,अंशत: अनुदानित व विना अनुदानित तसेच अनुदानास पात्र घोषित केलेल्या प्राथमिक, उच्च प्राथमिक, माध्यमिक, उच्च माध्यमिक शाळांमधील, रात्र शाळांमधील तसेच शासकीय व अनुदानित अध्यापक पदविका विद्यालयातील (डी.एल.एङ कॉलेज) शिक्षकांच्या रिक्त पदांवर भरती करताना सर्व उमेदवारांना निवडीची समान संधी मिळावी व शिक्षण सेवक पदासाठी उच्च गुणवत्ताधारक उमेदवाराची निवड होण्याच्या दृष्टीने शिक्षण सेवकाची भरती "अभियोग्यता व बुध्दीमत्ता चाचणी" यामध्ये मिळालेल्या गुणांच्या आधारावर करण्यात येईल. मात्र खाजगी शैक्षणिक संस्था अभियोग्यता व बुध्दीमत्ता चाचणीतील उच्चत्तम गुण प्राप्त उमेदवारांपैकी शिक्षण सेवकांची अंतिम निवड मुलाखतीच्या आधारे करील .

२. स्थानिक स्वराज्य संस्थांतर्गत शाळांमधील पदभरती भरतीपूर्व केंद्रीय निवड परीक्षेच्या माध्यमातून करण्यासाठीचे शासन निर्णय दि.३०.०४.२००८ , दि.१६.१२.२००९ व पवित्र प्रणाली मार्फत पद भरतीचे शासन निर्णय दि.२३.०६.२०१७, दि.२०.०६.२०१८ या शासन निर्णयाव्दारे अधिक्रमित करण्यात येत आहेत. यापूर्वी निर्गमित केलेले इतर शासन निर्णय / परिपत्रकातील प्रस्तुत शासन निर्णयाशी विसंगत असलेल्या तरतूदी रद्द करण्यात येत आहेत.

३. **परीक्षेचे आयोजन व स्वरुप :-** शिक्षण सेवकांच्या निवडीसाठी अभियोग्यता व बुध्दिमता चाचणी परीक्षेचे आयोजन शासन निश्चित करेल, अशा परीक्षा यंत्रणामार्फत आयोजित करण्यात येईल. सदर परीक्षा यंत्रणेकडून राज्यातील सर्व जिल्हयांमधील परीक्षा केंद्रे निश्चित करण्यात येतील. या चाचणी परिक्षेचे आयोजन व स्वरुप खालीलप्रमाणे राहील:-

**३.१** अभियोग्यता व बुध्दिमत्ता चाचणी परीक्षा ऑनलाईन पध्दतीने घेण्यात येईल. तथापि विषयनिहाय चाचणी घेतली जाणार नाही. सदर परीक्षा वस्तुनिष्ठ बहुपर्यायी स्वरुपाची असेल.

**३.२** समान काठिण्य पातळीच्या किमान १० ऑनलाईन प्रश्नपत्रिका सदर परीक्षा यंत्रणा तयार ठेवेल. परीक्षार्थ्यांना समान काठिण्य पातळीचे विविध प्रश्नपत्रिका देण्यात येतील.

**३.३** परीक्षेत मिळालेले गुण उमेदवारांस परीक्षा संपल्यावर त्वरीत कळतील.

**३.४** एका उमेदवारास गुण सुधारण्यासाठी जास्तीत जास्त ५ वेळा परीक्षेची संधी उपलब्ध राहील.

**३.५** परीक्षेत मिळालेले गुण सर्व प्रकारच्या शाळांमधील (प्राथमिक/उच्च प्राथमिक/ माध्यमिक/उच्च माध्यमिक/अध्यापक विद्यालय) पद भरतीसाठी ग्राहय धरण्यात येतील.

**३.६** उमेदवारास सदर परीक्षेत मिळालेले सर्वाधिक गुण, भरती प्रक्रियेतंर्गत प्रवर्गनिहाय कमाल वयोमर्यादेपर्यत ग्राहय धरण्यात येईल.

**३.७** अभियोग्यता चाचणी परीक्षेचे अायोजन शासन आवश्यकतेनुसार करेल.

**३.८** परीक्षेस बसणाऱ्या उमेदवारांची संख्या अधिक झाल्यास आणि एकाच वेळी सर्वांची ऑनलाईन चाचणी घेण्याची व्यवस्था करता येणे शक्य नसल्यास, काही फेऱ्यांमध्ये चाचणी परीक्षा घेण्यात येईल.

**३.९** परीक्षेचे संभाव्य वेळापत्रक परीक्षा यंत्रणेमार्फत जाहीर करण्यात येईल.

४. **परीक्षेचे माध्यम व अभ्यासक्रम** :- परीक्षेचे माध्यम मराठी, इंग्रजी व उर्दू असेल. उमेदवारांस यापैकी एक माध्यम निवडावे लागेल.

सदर परीक्षा एकूण २०० गुणांची राहील तसेच परीक्षेसाठी पुढीलप्रमाणे दोन घटक राहतील.

| अ.क्र. | घटक | शेकडा प्रमाण | एकूण गुण | एकूण प्रश्न |
|---|---|---|---|---|
| अ | अभियोग्यता | ६०% | १२० | १२० |
| ब | बुध्दिमत्ता | ४०% | ८० | ८० |
| | एकूण | १००% | २०० | २०० |

**अ)** अभियोग्यता या घटकांतर्गत गणितीय क्षमता, वेग आणि अचूकता, भाषिक क्षमता (इंग्रजी), भाषिक क्षमता (मराठी), अवकाशीय क्षमता, कल/आवड, समायोजन/व्यक्तिमत्व इत्यादी उपघटक सर्वसाधारणपणे राहतील.

**ब)** बुध्दिमत्ता या घटकांतर्गत आकलन, वर्गीकरण, समसंबंध, क्रम-श्रेणी, तर्क व अनुमान, कूट प्रश्न, सांकेतिक भाषा, लयबध्द मांडणी इत्यादी उपघटक सर्वसाधारणपणे राहतील.

सदर परीक्षा ही विषय ज्ञानावर होणार नाही. त्यामुळे या परीक्षेच्या अभ्यासक्रमासाठी विशिष्ट स्तर मर्यादा असणार नाही. तथापि राज्य शासन परीक्षेकरितेचा अभ्यासक्रम वेळोवेळी आवश्यकतेनुसार निर्धारित करेल.

५. **शिक्षण सेवक भरती कार्यपध्दती :-** शिक्षण सेवक रिक्त पदावर भरती अभियोग्यता व बुध्दीमत्ता चाचणीतील गुणांच्या आधारावर करताना अनुसरावयाची कार्यपध्दती पुढीलप्रमाणे राहील :-

**५.१** "सरल" (Systeamatic Administrative Reforms for Achievement in Learning by Studants) या संगणकीय प्रणालीवर नोंदणीकृत विद्यार्थी संख्येच्या आधारे सर्व शाळांची संचमान्यता करण्यात येईल. संचमान्यतेनंतर अतिरिक्त झालेल्या सर्व शिक्षकांचे समायोजन झाल्यानंतर रिक्त पदांची माहिती प्रसिध्द करण्यात येईल.

**५.२** सर्व व्यवस्थापनांच्या शाळातील शिक्षण सेवकांच्या रिक्त पदांच्या भरती करीता व्यावसायिक व किमान शैक्षणिक अर्हतेसह विषयनिहाय, माध्यमनिहाय, प्रवर्गनिहाय व बिंदू नामावलीनुसार रिक्त पदांचा तपशील "पवित्र" या संगणकीय प्रणालीमध्ये भरेल. त्यानुसार शिक्षणाधिकारी (प्राथमिक )/(माध्यमिक),प्रशासन अधिकारी मनपा/नपा अथवा विभागीय शिक्षण उपसंचालक यांच्याकडे प्रकरणपरत्वे जाहिरात परवानगीचा प्रस्ताव पदभरतीपूर्वी सादर करेल. संबधित शैक्षणिक संस्था तसेच सक्षम प्राधिकाऱ्यांनी करावयाची कार्यवाही याबाबतचे वेळापत्रक वेळोवेळी निश्चित करण्यात येईल. त्यासाठी माहिती भरणारी व तपासणी करणारी यंत्रणा "परिशिष्ट अ" मध्ये नमूद केल्याप्रमाणे राहिल. बिंदूनामावली प्रचलीत कार्यपध्दतीनुसार तपासणे आवश्यक राहिल. आदिवासी क्षेत्रातील शाळांमध्ये शिक्षण सेवक पद भरती करीता PESA (The Panchayat Extension To Scheduled Area Act १९९६) व महाराष्ट्र शासन राजपत्र अ साधाारण भाग दि. ०९ जून, २०१४ ची अधिसूचना यातील तरतूदी लागू राहतील.

**५.३** प्रत्येक शैक्षणिक संस्थेस तसेच संबधित प्राधिकाऱ्यांना आवश्यकतेनुसार स्वतंत्र Login (User name, Password) दिला जाईल. सक्षम प्राधिकाऱ्यांच्या Login वर माहिती प्राप्त झाल्यानंतर जाहिरातीतील माहिती उपरोक्त ५.२ नुसार बरोबर असल्याची खात्री करतील व सदरची माहिती बरोबर असल्यास मान्य करतील. माहिती अपूर्ण किंवा चुकीची असल्यास कारणासह अमान्य करतील.

**५.४** सक्षम प्राधिकारी यांनी सात कार्यालयीन दिवसाच्या विहित कालमर्यादेत प्रस्तावावर कार्यवाही न केल्यास त्याबाबतची सद्यस्थिती संबधित शिक्षण संचालक यांच्या Login वर दर्शविली

जाईल. संबधित शिक्षण संचालक Login वर प्राप्त झालेल्या माहितीच्या अनुषंगाने तीन कार्यालयीन दिवसाच्या आत सक्षम प्राधिकाऱ्यास कार्यवाही करण्याबाबत कळवतील.

सक्षम प्राधिकाऱ्यांनी विहित मुदतीत जाहिरात परवागी प्रस्तावावर निर्णय न घेतल्यास संबधित अधिकाऱ्यांच्या गोपनीय अहवालात याबाबतची नोंद घेण्याच्या सूचना त्यांच्या वरिष्ठ अधिकाऱ्यास शिक्षण संचालक (प्राथमिक/माध्यमिक व उच्च माध्यमिक) देतील.

**५.५** सक्षम प्राधिकारी यांनी मान्यता दिल्यानंतर संस्थेच्या मागणीनुसार पवित्र पोर्टलवर जाहिरात प्रदर्शित होईल. व संस्थेच्या Login वर दिसेल. तसेच संस्थेच्या प्रतिनिधीस त्याबाबत SMS व्दारे संदेश प्राप्त होईल. सदर जाहिरात www.edustaff.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रदर्शित होईल.

**५.६** वेबसाईटवर जाहिरात प्रदर्शित झाल्यानंतर तीन कार्यालयीन दिवसात संबधित शैक्षणिक संस्था सदर जाहिरात जास्त खपाच्या स्थानिक दोन वृत्तपत्रांमध्ये (त्यापैकी किमान एक मराठी भाषेतील) प्रसिध्द करतील. संस्थेच्या शाळा जिल्हयाच्या महसूल विभागाबाहेर असल्यास संस्था अनुक्रमे विभागस्तरीय/राज्यस्तरीय वृत्तपत्रांमध्ये जाहिरात प्रसिध्द करतील. तसेच संबधित जिल्हयातील सेवायोजन कार्यालय व जिल्हा समाज कल्याण कार्यालयासही अवगत करतील.

**५.७** इच्छुक व अर्हताप्राप्त उमेदवार जाहिरात प्रसिध्द झाल्याच्या दिनांकापासून आपल्या अभियोग्यता व बुध्दिमत्ता चाचणीमध्ये पात्र गुणांसह पवित्र प्रणालीवर ऑनलाईन सात दिवसाच्या आत अर्ज करतील. तसेच स्थानिक स्वराज्य संस्थामधील व खाजगी शिक्षण संस्थांमधील शिक्षण सेवकांच्या रिक्त पदासाठी स्वतंत्र प्राधन्यक्रम देतील.उमेदवार अर्जामध्ये प्रवर्ग व विषय यांचा विचार करुन प्राधान्यक्रम देऊ शकतील. उमेदवारांना स्थानिक स्वराज्य संस्थांमधील व खाजगी शैक्षणिक संस्थांमधील रिक्त जागांसाठी उपलब्ध असलेल्या सर्व रिक्त जागांसाठी पात्रतेनुसार प्राधान्यक्रम देता येतील.

**५.८** उमेदवारांनी प्राधान्यक्रम दिल्यानंतर पाच कार्यालयीन दिवसाच्या आत शिक्षण संचालक गुणानुक्रमानुसार माध्यम, प्रवर्ग, विषय व बिंदूनामावलीनुसार स्थानिक स्वराज्य संस्थांसाठी निवड सूची जाहिर करतील. उमेदवारांच्या अर्हतेनुसार ते ज्या पदांसाठी पात्र असतील त्या पदांसाठी निवडीचा क्रम उच्च माध्यमिक, माध्यमिक, उच्च प्राथमिक, प्राथमिक असा राहिल. संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थेस देखील त्यांच्या Login वर उच्चत्तम गुणप्राप्त उमेदवारांची निवडसूची उपलब्ध होईल. स्थानिक स्वराज्य संस्थेतील नियुक्ती प्राधिकारी त्यांच्या अधिकार क्षेत्रातील रिक्त पदावर निवडसूचीतील उमेदवारांची नियुक्ती सात कार्यालयीन दिवसात करतील. विहित कालावधीत नियुक्तीसाठी हजर न राहिलेला उमेदवार स्थानिक स्वराज्य संस्थेतील भरती प्रक्रीयेतून बाद होईल.

**५.९** खाजगी व्यवस्थापनांच्या शाळांकरीता प्रत्येक रिक्त जागेकरीता उपलब्ध असल्यास समांतर आरक्षणासह १:१० या गुणोत्तराप्रमाणे उमेदवारांचा प्राथम्य क्रम, गुणानुक्रम, माध्यम, प्रवर्ग, विषय व बिंदूनामावलीनुसार उच्चतम गुणप्राप्त उमेदवारांची निवडसूची त्या व्यवस्थापनाच्या लॉगिनवर शिक्षण संचालक उपलब्ध करुन देतील. संबधित खाजगी व्यवस्थापन त्यांच्या लॉगिनवर मुलाखतीसाठी उपलब्ध झालेल्या निवडसूचीतील उमेदवारांची मुलाखत घेऊन व त्यांची अध्यापन कौशल्ये तपासून त्या आधारे उच्चतम गुण प्राप्त झालेल्या उमेदवाराची रिक्त पदावर निवड करेल. मुलाखत व अध्यापन कौशल्यासाठी एकूण ३० गुण असतील. मुलाखत व अध्यापन कौशल्याव्दारे संबंधित शैक्षणिक संस्था उमेदवारांचे गुणपत्रक व निकाल पवित्र प्रणालीवर जाहिर करतील. त्याच बरोबर मुलाखतीस उपस्थित राहिलेल्या उमेदवाराला देखील त्यांचा निकाल व्यक्तिशः कळवतील. गुणपत्रकानुसार प्रथम क्रमांकावर असलेल्या उमेदवाराची नियुक्ती ७ कार्यालयीन दिवसात संबंधित शैक्षणिक संस्था करेल.

निवड झालेला उमेदवार ७ कार्यालयीन दिवसात हजर न झाल्यास गुणानुक्रमे पुढील उमेदवाराची नियुक्ती संस्था करेल.

**५.१०** संबधित शैक्षणिक संस्था यांनी या प्रक्रियेव्दारे संबधित उमेदवारास नियुक्ती पत्र दिल्यानंतर शिक्षण सेवक पदी रुजू होण्यापूर्वी आवश्यक सर्व मूळ कागदपत्रांची (शालान्त/उच्च माध्यमिक अभ्यासक्रमाची गुणपत्रिका व प्रमाणपत्र, मान्यताप्राप्त विद्यापिठाची शैक्षणिक व व्यावसायिक अभ्यासक्रम पूर्ततेची पदवी/ पदविका, शाळा सोडल्याचा दाखला, जातीचे प्रमाणपत्र, जात वैधता प्रमाणपत्र (मागासवर्गीय प्रवर्गातील उमेदवारांकरिता) creamylayer प्रमाणपत्र, शिक्षक पात्रता परीक्षा(इ.१ ली ते ८ वी करीता) / अभियोग्यता व बुध्दीमत्ता चाचणी परीक्षेमध्ये मिळालेले गुण तसेच समांतर आरक्षण (महिला/दिव्यांग/खेळाडू इत्यादी)), त्या-त्या प्रवर्गात आवश्यक असलेले इतर सर्व कागदपत्रांची तपासणी संबंधित स्थानिक स्वराज्य सस्थेचे नियुक्ती प्राधिकारी ३ (तीन) कार्यालयीन दिवसांत करतील. खाजगी शैक्षणिक संस्था निवडसूचीतील उमेदवारांच्या मुलाखती दरम्यान वरील सर्व कागदपत्रांची तपासणी करतील.

नियुक्ती करीता उमेदवाराने सादर केलेले कागदपत्र खोटे अथवा बनावट असल्याचे त्यांच्या सेवेच्या कालावधीत निदर्शनास आल्यास संबंधित उमेदवार फौजदारी कारवाईस पात्र असेल व त्यांच्या सेवा त्वरित समाप्त करण्यात येतील.

**५.११** नियुक्ती करावयाचे उमेदवार आवश्यक अर्हता धारण करीत नसल्याचे छाननी अंती आढळल्यास नियुक्ती प्राधिकारी अशी नोंद ऑनलाईन पध्दतीने करेल. त्यानुसार उमेदवारास प्रणालीद्रारे माहिती प्राप्त होईल. या संदर्भात उमेदवारास अाक्षेप असल्यास सात दिवसांच्या आत पवित्र प्रणालीवर तो असा आक्षेप नोंदवू शकेल. सदर अाक्षेप शैक्षणिक संस्था/विभागीय शिक्षण उपसंचालकांना प्रणालीवर दिसेल. त्यावर शिक्षण उपसंचालक सात दिवसांच्या आत निर्णय घेतील.

**५.१२** छाननी अंती मुळ कागदपत्र योग्य असल्याची खात्री झाल्यास नियुक्तीस पात्र उमेदवारांना संबंधित स्थानिक स्वराज्य संस्था व खाजगी शैक्षणिक संस्था वर नमूद केल्याप्रामणे तीन दिवसांच्या कालावधीत ई-मेल व्दारे तसेच नोंदणीकृत डाकेने नियुक्त पत्र पाठवेल.

**५.१३** उमेदवाराने नियुक्त पत्रास सात दिवसांच्या आत स्वीकृती कळविणे बंधनकारक राहिल. अशी स्वीकृती दिल्यानंतर संबंधित शाळेचा मुख्याध्यापक त्या उमेदवारास शिक्षण सेवक म्हणून "पवित्र" संगणकीय प्रणाली व्दारे ऑनलाईन रुजू करुन घेतील. तसा रुजू अहवाल प्रणालीवर भरतील. त्यामुळे सदर शिक्षण सेवकाची माहिती "सरल" संगणक प्रणालीवर आपोआप अद्ययावत होईल व "शालार्थ" प्रणालीसाठी उपलब्ध राहिल. निवड झालेल्या उमेदवारास संस्थेने रुजू करुन न घेतल्यास अशा संस्थांच्या शाळेतील संबधित पद व्यपगत करण्यात येईल.

**५.१४** उमेदवार नियुक्तीसाठी हजर न झाल्यामुळे अथवा अपात्र ठरल्यामुळे रिक्त राहिलेल्या शिक्षण सेवकांच्या पदांसाठी पुन्हा निवड प्रक्रीया राबविण्यात येईल. उमेदवाराची स्थानिक स्वराज्य संस्थेच्या शाळेत निवड झाल्यास त्याचा खाजगी शैक्षणिक संस्थेमध्ये त्याच गटातील नियुक्तीसाठी विचार केला जाणार नाही. त्यामुळे उमेदवाराने प्राधान्यक्रम विचारपूर्वक द्यावा.

**५.१५** संबंधित संस्थेव्दारे नियुक्तीपत्र पाठविल्यानंतर निवड झालेल्या उमेदवारांचे त्या तारेखे पर्यंतचे गुण बाद ठरविण्यात येतील. अर्थात प्राप्त गुणांचा उपयोग एका पेक्षा अधिक नियुक्तीसाठीकरता येणार नाही. तथापि, खालील परिस्थितीमध्ये उमेदवारांना दुसरी नियुक्ती स्वीकारण्याची परवानगी राहील:-

(१) पहिली नियुक्ती विनाअनुदानित/अंशत: अनुदानित/ शासकीय अनुदानाच्या प्रतिक्षेत असलेल्या शाळेत झाली असल्यास आणि सध्याचा अर्ज अनुदानीत संस्थेकरीता असल्यास.

(२) उमेदवाराने आपल्या पाच संधीची मर्यादा संपविली नसल्यास, त्यास पुन्हा चाचणी देऊन नवीन गुण मिळविता येतील हे नवीन गुण प्रवर्गनिहाय वयोमर्यादेत वापरता येतील.

**५.१६** पवित्र प्रणालीव्दारे करावयाच्या शिक्षण सेवक / शिक्षक भरतीसाठी प्राथमिक शाळांच्या बाबतीत शिक्षण संचालक (प्राथमिक)तसेच माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांच्या बाबतीत शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) हे "नोडल अधिकारी" म्हणून काम पाहतील. शिक्षक भरतीसंबंधी येणाऱ्या सर्व अडचणीचे निराकरण संबंधित "नोडल अधिकारी" आवश्यकतेनुसार शासनाच्या सहमतीने करतील.

**५.१७** उमेदवार शैक्षणिक व व्यावसायिक अर्हता, वय, जात प्रमाणपत्र, जात वैधता प्रमाणपत्र आणि इतर सर्व आवश्यक प्रमाणपत्र याबाबत अपात्र झाल्यास, संबंधित उमेदवाराची या परीक्षेसाठीची अर्हता संपुष्टात येईल. मात्र आवश्यक अर्हतेच्या पूर्तते अंती याच किंवा सुधारीत गुणाच्या आधारावर अर्ज करण्यास उमेदवार पात्र असतील.

**५.१८** या शासन निर्णयानंतर करण्यात येणाऱ्या शिक्षण सेवक नियुक्तीकरिता वैयक्तिक मान्यता तसेच ना-हरकत प्रमाणपत्राची गरज राहणार नाही. त्यामुळे स्वयंअर्थसहाय्यित शाळा, अल्पसंख्याक संस्था संचलित शाळा व इंग्रजी माध्यमाच्या कायम विना अनुदानित शाळांमधील आणि अनुकंपा तत्वावर नियुक्त करण्यात आलेली शिक्षण सेवक नियुक्ती वगळून "पवित्र प्रणाली" मार्फत करण्यात येणाऱ्या शिक्षण सेवक नियुक्तीकरिता शासन निर्णय दि. ६.२.२०१२, २०.६.२०१४, मध्ये वैयक्तिक मान्यता तसेच ना-हरकत प्रमाणपत्रासंदर्भात करण्यात आलेल्या तरतूदी लागू राहणार नाहीत. तसेच शासन निर्णय दि.२ मे, २०१२ अधिक्रमित करण्यात येत आहे.

**६. शिक्षण सेवकाच्या नियुक्तीच्या कालावधी**

**६.१** स्थानिक स्वराज्य संस्था व पूर्णत: अनुदानित शाळांमध्ये नियुक्त शिक्षण सेवकांचा परिविक्षाधीन कालावधी दिनांक २७.०२.२००३ तसेच दिनांक १३.१०.२००० च्या शासन निर्णयामध्ये दर्शविल्याप्रमाणे सर्वसाधारणपणे तीन वर्ष राहील.

**६.२** अंशत: अनुदानित/विनाअनुदानित शाळांमध्ये नियुक्त सह शिक्षकांचा परिविक्षाधीन कालावधी सर्वसाधारणपणे २ वर्ष राहिल.

७. **रजेच्या कालावधीतील नियुक्ती :-** करिता संदर्भाधिन शासन निर्णय क्र.०७ मधील तरतूदी लागू राहतील.

८. **नियुक्तीचे माध्यम :-** शिक्षण सेवक पदासाठी आवश्यक असलेल्या शैक्षणिक व व्यावसायिक अर्हतेनुसार उमेदवाराने ज्या माध्यमासाठी अर्ज केला असेल, त्या माध्यमासाठीच पदावर नियुक्ती देण्यात येईल.

९. **शिक्षण सेवकाची वयोमर्यादा** :- शिक्षण सेवक पदी किमान वयोमर्यादा १८ वर्ष व कमाल वयोमर्यादा खुल्या प्रवर्गातील उमेदवाराकरीता ३८ वर्ष व मागास प्रवर्गातील उमेदवारांकरीता ४३ वर्ष राहील. समांतर आरक्षण व दिव्यांग उमेदवारांना शासनाने विहित केलेली वयोमर्यादा लागू राहील. वर्यामर्यादेबाबत शासन, वेळोवेळी शासन निर्णयाव्दारे विहित करील, अशी वयोमर्यादा शिक्षण सेवकांना लागू होईल.

१०. **कागदपत्रांची तपासणी** :- शिक्षण सेवक पदी निवड झालेल्या उमेदवारांच्या नियुक्तीपूर्वी त्याच्या शैक्षणिक व व्यावसायिक प्रमाणपत्राची पडताळणी खालील समितीमार्फत करण्यात येईल.

**अ)** जिल्हा परिषदेच्या शाळांसाठी खालीलप्रमाणे समिती राहील :-

१. मुख्य कार्यकारी अधिकारी - अध्यक्ष
२. समाज कल्याण अधिकारी - सदस्य
३. शिक्षणाधिकारी (प्राथमिक) - सदस्य सचिव

**ब)** महानगर पालिकेच्या शाळांसाठी खालीलप्रमाणे समिती राहील :-

१. आयुक्त, महानगरपालिका - अध्यक्ष
२. संबंधित जिल्हयातील समाजकल्याण अधिकारी - सदस्य
३.प्रशासन अधिकारी - सदस्य सचिव

**क)** नगर परिषद / नगरपालिकेच्या शाळांसाठी खालीलप्रमाणे समिती राहील:-

१. मुख्याधिकारी - अध्यक्ष

२. संबंधित जिल्हयातील समाजकल्याण कार्यालयातील प्रतिनिधी - सदस्य

३. प्रशासन अधिकारी - सदस्य सचिव

**ड)** कटक मंडळांच्या शाळांसाठी संबंधित कार्यालय प्रमुखाने उपरोक्त प्रमाणे समिती नियुक्त करावी.

**इ)** खाजगी शैक्षणिक संस्थांतर्गत असलेल्या शाळांमध्ये निवड झालेल्या उमेदवारांच्या कागदपत्राची पडताळणी शाळा समिती मार्फत करण्यात येईल.

११. महाराष्ट्र कर्नाटक सीमावर्ती भागातील ८६५ गावातील मराठी माध्यमाच्या डी.एड /टी.सी.एच. अभ्यासक्रम घेऊन अर्हताप्राप्त झालेल्या उमेदवारांना महाराष्ट्र राज्यातील विहीत नियमाप्रमाणे शिक्षण सेवक पदासाठी अर्ज करण्यास पात्र ठरविण्यात येत आहे. मात्र सदर उमेदवारांना महाराष्ट्र राज्यातील आरक्षणाच्या सोयी सवलती अनुज्ञेय असणार नाहीत.

१२. शिक्षण सेवक भरती "पवित्र" प्रणालीव्दारे न करणाऱ्या शैक्षणिक संस्थांना/शाळांना संबंधित रिक्त पदांचे वेतन किंवा वेतनेतर अनुदान अनुज्ञेय होणार नाही.

१३. स्वयंअर्थसहाय्यित शाळा, अल्पसंख्याक संस्था संचलित शाळा व इंग्रजी माध्यमाच्या कायम विना अनुदानित शाळांमधील शिक्षण सेवक भरती आणि अनुकंपा तत्वावर नियुक्त करण्यात आलेल्या शिक्षण सेवक भरतीस "पवित्र" प्रणालीमार्फत नियुक्ती प्रक्रिया लागू राहणार नाही.

१४. महाराष्ट्र खासगी शाळातील कर्मचारी (सेवेच्या शर्ती) नियमावली-१९८१ मधील नियम ९ (२) (ब) मध्ये दुरुस्ती करण्यात येत आहे.

१५. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१९०२०७१३१६२५४३२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Vandana Krishna
Date: 2019.02.07 13:20:13 +05'30'

**(वन्दना कृष्णा)**

**अपर मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत:-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई

२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

३) मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधान सभा महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४) मा. मंत्री (शालेय शिक्षण ) यांचे खाजगी सचिव.
५) मा. मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव.
६) मा. राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव.
७) मा. विधान परिषद/विधान सभा सदस्य (सर्व), विधान भवन, मुंबई.
८) मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक.
९) अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय मुंबई.
१०) प्रधान सचिव, (सर्व) मंत्रालय,मुंबई.
११) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२) शिक्षण संचालक (प्राथमिक),महाराष्ट्र राज्य,पुणे.
१३) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक),महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४) संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे.
१५) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ.
१६) विभागीय आयुक्त (महसूल विभाग) सर्व
१७) सर्व जिल्हाधिकारी,
१८) आयुक्त, महानगरपालिका (सर्व)
१९) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
२०) आयुक्त, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, पुणे.
२१) मुख्याधिकारी, नगर पालिका/नगर परिषद (सर्व)
२२)सर्व विभागीय उपसंचालक (शिक्षण)
२३) सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी,शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय मुंबई.
२४) शिक्षण निरिक्षक (उत्तर/दक्षिण/पश्चिम), मुंबई.
२५) सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक), जिल्हा परिषद.
२६) निवड नस्ती (टिएनटी-१)

**(शासन निर्णय क्र.सीईटी २०१५/प्र.क्र.१४९/टीएनटी १, दिनांक ०७ फेब्रुवारी, २०१९ चे सहपत्र)**

## परिशिष्ट - अ

## सक्षम प्राधिकारी

| अ. क्र. | संस्था | बिंदूनामावली भरणारे प्राधिकारी | तपासणारे व जाहिरातीस मान्यता देणारे सक्षम प्राधिकारी |
|---|---|---|---|
| १ | खाजगी प्राथमिक/ माध्यमिक शैक्षणिक संस्था | अध्यक्ष / सचिव संबंधित संस्था | शिक्षण निरीक्षक/ शिक्षणाधिकारी (प्राथमिक/ माध्यमिक) |
| २ | खाजगी उच्च माध्यमिक अध्यापक विद्यालये/ शैक्षणिक संस्था | अध्यक्ष / सचिव संबंधित संस्था | शिक्षण निरीक्षक/ शिक्षणाधिकारी (प्राथमिक/ माध्यमिक) |
| ३ | जिल्हा परिषद | शिक्षणाधिकारी (प्राथमिक) | मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद |
| ४ | महानगरपालिका | प्रशासन अधिकारी/ शिक्षणाधिकारी | आयुक्त (महानगरपालिका) |
| ५ | नगर पालिका / नगर परिषद/ कटक मंडळे | प्रशासन अधिकारी | विभागीय शिक्षण उपसंचालक |

-------